**अचानक नाहीशा झालेल्या व ठावठिकाणा माहित नसलेल्या शासकीय कर्मचारी / निवृत्तीवेतनधारक यांच्या कुटुंबियांना कुटुंब निवृत्तीवेतन मंजूर करणेबाबत**
**बेपत्ता श्री. यशवंत पतिराम सिरसाम, पोलीस शिपाई, पोलीस अधिक्षक कार्यालय, नागपूर ( ग्रामीण ), नागपूर.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कुनिवे-०८१४/प्र.क्र.१४२/आस्था-१**
हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा रोड,
नविन प्रशासकीय भवन , १२ वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १३ मे, २०१५.

**वाचा :**

१) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : सेनिवे-१०३९/४९१/सेवा-४, दि. ५.०७.१९९१.**
२) **पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/३९/४२/ कुनिवे/३३/२०१४, दि. १६.०८.२०१४.**
३) **पोलीस अधीक्षक, नागपूर ग्रामीण यांचे कार्यालयाचे पत्र क्र.नाजिग्रा/डी-१८/ लेखा/कुं.नि.वे./सिरसाम/२०१४/५५८६, दि. १२.०५.२०१४.**

**प्रस्तावना :**

श्री. यशवंत पतिराम सिरसाम, पोलीस शिपाई हे पोलीस अधिक्षक, नागपूर ( ग्रामीण ) यांचे आस्थापनेवर कार्यरत असताना दि. २३.०१.२००५ पासुन बेपत्ता झाले आहेत. श्री. यशवंत पतिराम सिरसाम, पोलीस शिपाई बेपत्ता झाल्याची खबर पोलीस स्टेशन, देवलापूर, जिल्हा नागपूर येथे दि. १४.०३.२००५ रोजी नोंद केली आहे.

२. श्री. यशवंत पतिराम सिरसाम, पोलीस शिपाई हे पोलीस अधीक्षक, नागपूर ( ग्रामीण ) यांचे आस्थापनेवर कार्यरत असताना दि.२३.०१.२००५ पासुन बेपत्ता असल्याबाबत त्यांची पत्नी श्रीमती गिता यशवंत सिरसाम यांनी दि.१४.०३.२००५ ला पोलीस स्टेशन, देवलापार येथे तक्रार दाखल केली. प्रथम खबरी अहवाल नोंदवून दि. १३.०३.२०१२ रोजी ७ वर्ष पूर्ण झाल्याने व ठाणेदार पोलीस स्टेशन, देवलापार, जिल्हा नागपूर यांनी सदर इसम अद्याप मिळाला नसल्याबाबत अहवाल दि. २.०६.२०१२ रोजी दिला असल्याने श्री. यशवंत पतिराम सिरसाम, पोलीस शिपाई यांच्या पत्नी श्रीमती गिता यशवंत सिरसाम यांना कुटुंब निवृत्तीवेतन मिळणेबाबतचा प्रस्ताव पोलीस अधीक्षक, नागपूर ( ग्रामीण ) यांनी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या मार्फत शासनास सादर केला आहे.

**शासन निर्णय:**

श्री. यशवंत पतिराम सिरसाम, पोलीस शिपाई हे पोलीस अधीक्षक, नागपूर ( ग्रामीण) यांचे आस्थापनेवर कार्यरत असताना दि.२३.०१.२००५ पासुन बेपत्ता असल्याबाबत त्यांची पत्नी श्रीमती गिता यशवंत सिरसाम यांनी दि.१४.०३.२००५ रोजी पोलीस स्टेशन, देवलापार येथे तक्रार दाखल केली.

ठाणेदार पोलीस स्टेशन, देवलापार, जिल्हा नागपूर यांनी श्री. यशवंत पतिराम सिरसाम हे सापडले नसल्याबाबतचा अहवाल दि. २.०६.२०१२ रोजी दिला आहे. यानुषंगाने श्रीमती गिता यशवंत सिरसाम यांना कुटुंब निवृत्तीवेतन देण्यास शासन मंजूरी देत आहे. तथापि, वित्त विभाग, क्र.सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि. ५.७.१९९१ अन्वये क्षतिपूर्ती बंधपत्र परिपूर्ण करुन व आवश्यक बाबींची पूर्तता करुन घेण्याची खबरदारी पोलीस अधीक्षक, नागपूर (ग्रामीण), नागपूर यांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि. ५.०७.१९९१, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि. ७.१०.१९९३, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०९४/१५६/सेवा-४, दि.२६.०६.१९९५, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०००/प्र.क्र. ८३/सेवा-४, दि. ३.०७.२००० ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.सूचीचा मजकूर लिहा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१३१५१२३७७६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yuvraj Bayaji Ajetrao

Digitally signed by Yuvraj Bayaji Ajetrao
DN: CN = Yuvraj Bayaji Ajetrao, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.13 15:15:17 +05'30'

**(युवराज अजेटराव)**
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१ पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२ पोलीस अधीक्षक, नागपूर (ग्रामीण), नागपूर.
३ बेपत्ता श्री. यशवंत पतिराम सिरसाम यांच्या पत्नी श्रीमती गिता यांस पोलीस अधीक्षक, नागपूर (ग्रामीण), नागपूर यांचे कार्यालयामार्फत.
४ महालेखापाल (लेखा व हकदारी), महाराष्ट्र,१/२, मुंबई/नागपूर.
५ कोषागार अधिकारी, नागपूर.
निवड नस्ती (आस्था-१)